**मुंबई मेट्रो टप्पा-३ (कुलाबा-बांद्रा-सिप्झ) करीता फ्री प्रेस जर्नल मार्गावरील उप संचालक व सहाय्यक संचालक, नागरी पुरवठा यांचे कार्यालय तात्पुरत्या स्वरुपात स्थलांतरीत करुन त्यांना जागा वाटप करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः शाकाजा-१११५/प्र.क्र.१०९/२०१५/२२

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२

तारीख: ०९ फेब्रुवारी, २०१७

**प्रस्तावना -**

मुंबई मेट्रो टप्पा-३ (कुलाबा-बांद्रे-सिप्झ) संपूर्णत: भूयारी मार्ग प्रकल्पाची कार्यवाही सुरु करण्यात येणार आहे. मुंबई मेट्रो टप्पा-३ (कुलाबा-बांद्रे-सिप्झ) साठी तयार केलेल्या प्रकल्प आराखड्यामध्ये फ्री प्रेस जर्नल मार्गावरील कुटीरांमध्ये (बॅरेक्समध्ये) कार्यरत असणाऱ्या उप संचालक व सहाय्यक संचालक, नागरी पुरवठा कार्यालयाकरीता मुख्य अभियंता, मुंबई पोर्ट ट्रस्ट, जी.डब्लू.एन.डी. ऑफिस तळ मजला, कॉटन ग्रीन, मुंबई-२३ येथे ६०० चौ.फूट जागा तात्पुरत्या स्वरुपात वाटप करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता, त्यानुषंगाने आता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय -**

फ्री प्रेस जर्नल मार्गावरील कुटीरांमध्ये (बॅरेक्समध्ये) दर्शविलेल्या उप संचालक व सहाय्यक संचालक, नागरी पुरवठा कार्यालयाकरीता मुख्य अभियंता, मुंबई पोर्ट ट्रस्ट, जी.डब्लू.एन.डी. ऑफिस तळ मजला, कॉटन ग्रीन, मुंबई-२३ येथे आयुक्त, अन्न व नागरी पुरवठा यांना वाटप केलेल्या ३००० चौ.फूट जागेशेजारी ६०० चौ.फूट जागा तात्पुरत्या स्वरुपात वाटप करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

२. नवीन स्थलांतरीत ठिकाणी कार्यालयाची रचना कशी असावी याबाबत संबंधित विभाग/कार्यालयांने आराखडा तयार करुन सदरचा आराखडा मुं.म.प्र.वि.प्राधिकरण आणि मुंबई मेट्रो रेल्वे महामंडळ (एमएमआरसी) यांना उपलब्ध करुन द्यावा.

३. उप संचालक व सहाय्यक संचालक, नागरी पुरवठा कार्यालयाने उपलब्ध करुन दिलेल्या आराखड्यानुसार जागेची आखणी, बसण्याची व्यवस्था तसेच कार्यालय हलविणे/स्थलांतरणासाठी मुं.म.प्र.वि.प्राधिकरण आणि एम.एम.आर.सी. यांनी आवश्यकती कार्यवाही करावी. तसेच मुंबई मेट्रो टप्पा-३ (कुलाबा-बांद्रे-सिप्झ) चे कामकाज पुर्ण झाल्यानंतर फ्री प्रेस जर्नल मार्गावरील कुटीरांच्या (बॅरेक्सच्या) मुळ जागेत नव्याने कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करुन या कार्यालयीन इमारतीमध्ये स्थलांतरीत करण्यात आलेल्या उप संचालक व सहाय्यक संचालक, नागरी पुरवठा कार्यालयास जागेची आखणी, बसण्याची व्यवस्था तसेच कार्यालय हलविणे/स्थलांतरणासाठी मुं.म.प्र.वि.प्राधिकरण आणि एम.एम.आर.सी. यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२०९१५४२१४२२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pramod Harishchandra Bhagat

Digitally signed by Pramod Harishchandra Bhagat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400031, st=Maharashtra, cn=Pramod Harishchandra Bhagat
Date: 2017.02.09 15:44:27 +05'30'

**( प्र. ह. भगत )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व सन्माननीय विधानसभा/परिषद व संसद सदस्य
२. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधान मंडळ, मुंबई
३. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. सर्व मा.अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई-३२.
८. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. व्यवस्थापकीय संचालक, मुंबई मेट्रो रेल्वे महामंडळ, प्लॉट नं. R-१३, E Block, बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पू.), मुंबई-५१.
१०. अपर जिल्हाधिकारी, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पू.), मुंबई-५१.
११. मुख्य विभागीय अधिकारी तथा सदस्य भाडे कमिटी (मेट्रो-३), मुंबई मेट्रो रेल्वे महामंडळ, प्लॉट नं. R-१३, E Block, बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पू.), मुंबई-५१.
१२. सह सचिव (का.२२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. उप संचालक व सहाय्यक संचालक, नागरी पुरवठा आयुक्त यांचे कार्यालय, शासकीय कुटीर क्र.५, फ्रि प्रेस जर्नल मार्ग, मुंबई.
१४. निवडनस्ती.